**शैक्षणिक वर्ष २०२१-२२ गुणवंत विद्यार्थ्यांना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१९/प्र.क्र.२७४/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक: १० डिसेंबर, २०२१.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२१८/तांशि-४, दि.०४ ऑक्टोबर,२०१८.
२) शासन शुध्दिपत्रक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२१८/तांशि-४, दि.३० ऑक्टोबर,२०१८.
३) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र.१९/डीटीई/परदेशी शिष्यवृत्ती/२०१८/२०७, दि.११ सप्टेंबर,२०१९.
४) समक्रमांकाचे शासन निर्णय दि.१८ सप्टेंबर, २०१९.
५) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.११६/तांशि-४, दि.०६ सप्टेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

परदेशात उच्च शिक्षणाचा लाभ घेणाऱ्या गुणवंत विद्यार्थ्यांसाठी शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून सदरची शिष्यवृत्ती योजना लागू करण्यात आलेली आहे. याकरीता पदव्युत्तर पदवी/पदव्युत्तर पदविका तसेच पीएचडी अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेल्या २० गुणवंत विद्यार्थ्यांची सदर शिष्यवृत्ती योजनेकरीता निवड करण्यात येते. सदर योजनेची कार्यपध्दती व निवड प्रक्रीया ही संदर्भाधीन क्र.१ येथील दि.०४ ऑक्टोबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये ठरविण्यात आलेली आहे. त्यानुसार शैक्षणिक वर्ष २०२१-२२ करीता वर्तमानपत्रात जाहिरातीव्दारे प्रसिध्दी देवून ऑनलाईन पध्दतीने अर्ज मागविण्यात आले.

त्यानुसार विहित कालमर्यादेपर्यंत तंत्रशिक्षण संचालनालयाकडे ऑनलाईन पोर्टलवर ५७ अर्ज प्राप्त झाले. प्राप्त झालेल्या सदर अर्जांची छाननी करुन दि.१६ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या छाननी समितीच्या बैठकीत सादर करण्यात आले. छाननी समितीने सदर अर्जांची छाननी करुन व पात्रतेच्या अटी/शर्ती तपासून विदयार्थ्यांची यादी समितीच्या शिफारशीसह निवड समितीपुढे निर्णयार्थ सादर केली.

त्यानुसार मा.प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या निवड समितीची सर्वसंबधितांसमवेत दि.०३.१२.२०२१ रोजी बैठक झाली. सदर बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार शैक्षणिक वर्ष २०२१-२२ करीता पात्र ठरलेल्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती अनुज्ञेय करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

परदेशात उच्च शिक्षणाचा लाभ घेणाऱ्या गुणवंत विद्यार्थ्यांसाठी शैक्षणिक वर्ष २०२१-२२ करीता खालील विदयार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे.

१. पीएच.डी. अभ्यासक्रमाकरीता १० जागा उपलब्ध असून सदर अभ्यासक्रमाकरीता गुणवत्ता यादीतील उमेदवारांपैकी शाखानिहाय गुणवत्ता यादीतील गुणवत्ता क्रमांकानुसार खालीलप्रमाणे ४ उमेदवारांची निवड करण्यात आली आहे.:-

| अ. क्र. | शाखा | उमेदवाराचे नांव | प्रवेश घेतलेल्या अभ्यासक्रमाचे नांव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नांव |
|---|---|---|---|---|
| १ | अभियांत्रिकी | श्रीम. रुचा शिशीर देशपांडे | Ph.D. in Environmental Science | The University of Manchester, United Kingdom |
| | | श्रीम. किरण अरुण निर्मल | Ph.D. in Engineering | Korea University, South Korea |
| | | श्री. प्रविणकुमार सुभाष पाटील | Ph.D. in Engineering | The University of Edinburgh, United Kingdom |
| २ | विज्ञान | श्री. लिजो एन. वर्गीस | Ph.D. in Philosophy | University of Otago, New Zealand |

२. पदव्युत्तर पदवी/ पदव्युत्तर पदविका अभ्यासक्रमाकरीता रिक्त राहिलेल्या वरील ६ जागा हया फक्त या वर्षाकरीताच त्याच शाखेतील पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाकरीता गुणवत्ता यादीतील ज्येष्ठता क्रमानुसार उमेदवारांना उपलब्ध करुन खालीलप्रमाणे १६ उमेदवारांची निवड करण्यात आलेली असून सदर निवड केलेल्या शिष्यवृत्तीधारकांची नावे खालीलप्रमाणे आहेत.:-

| अ. क्र. | शाखा | उमेदवाराचे नांव | प्रवेश घेतलेल्या अभ्यासक्रमाचे नांव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नांव |
|---|---|---|---|---|
| १ | व्यवस्थापन | श्रीम. सेलेस्टे मोंटू फर्नांडिस | Master of International HRM and Comparative Industrial Relations | The University of Manchester, United Kingdom |
| २ | कला | श्रीम. झेबा शकील वारसी | Masters of Arts program in the Politics concentration | Columbia University, United States of America. |
| ३ | विज्ञान | १) श्री. हर्षल हनुमंत नहाणे | Master of Business Analytics | Carlson School of Management - University of Minnesota, United States of America |
| | | २) श्रीम. किमया भरत गांवकर | Master of Applied Paediatric Neuro psychology | University College London (UCL), United Kingdom |
| ४ | अभियांत्रिकी / वास्तुकला शास्त्र | १) श्रीम. अमृता धनंजय साळुंखे | Master's in Biomedical Engineering | New York University, United States of America |
| | | २) श्री. ध्रुवल सुरेश शहा | Master's in Materials Science and Engineering | University of Pennsylvania, United States of America |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | ३) श्री. प्रज्वल प्रक्षेप सोमवंशी | Master's in Mechatronics and Robotics | New York University, United States of America |
| | | ४) श्री.संकेत अंकुश साळुंखे | Master's in Mechatronics and Robotics | New York University, United States of America |
| | | ५) श्री.अमित अनिल चौगले | Master of Biopharmaceutical Engineering | The University of Adelaide, Australia |
| | | ६) श्रीम.श्रुती आदिनाथ वेदांते | Masters in Biopharmaceutical Engineering | The University Of Adelaide, Australia |
| | | ७) श्री. प्रथमेश माणिक बच्चे | Masters in Technology, Work and Health | KTH Royal Institute of Technology, Stockholm, Sweden |
| | | ८) श्री.जिनांग अतुल शहा | Masters in Biomedical Engineering | Duke University, United States of America |
| | | ९) श्री.सचिन जयसिंग खांबे | Masters in Engineering | The University of Edinburgh, United Kingdom |
| | | १०) श्री.राजदीप शंकर पवार | Masters in Computational Biology | Carnegie Mellon University, United States of America |
| | | ११) श्री.श्रेयस अरविंद कुलकर्णी | Masters in Integrated Product Design | Delft University of Technology, Netherlands |
| | | १२) श्रीम.मानसी मिलिंद सावंत | Master of Science Programme Global Production Engineering | TU Berlin (Techniche University, Berlin) |

३. वरील नमूद केलेल्या पात्र विद्यार्थ्यांना खालील अटींच्या अधीन राहून परदेशी शिष्यवृत्ती मंजूर करण्यात येत आहे.:-

३.१. सदर शिष्यवृत्ती मंजूर करण्यासाठी शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या निकषांचे पालन होणे आवश्यक आहे.

३.२. ही शिष्यवृत्ती गृह चौकशीच्या अधीन राहून मंजूर करण्यात आली असून गृह चौकशीमध्ये विद्यार्थ्यांचा शिष्यवृत्तीचा अर्ज दाखल करताना चूकीची माहिती सादर केली असल्याचे निदर्शनास आल्यास सदरची शिष्यवृत्ती रद्द करण्यात येईल.

३.३. कोणत्याही विद्यार्थ्याने खोटी माहिती / कागदपत्रे सादर केल्याचे सिध्द झाल्यास अथवा शासनाने निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे कर्तव्यात कसूर केल्यास, त्यास ताबडतोब पुढील शिक्षणासाठी अटकाव (Debarred) केला जाईल व त्याच्याकडून झालेल्या खर्चाची १५ टक्के चक्रवाढ व्याजाने वसूली करण्यात येईल, अशा विद्यार्थ्याचा काळ्या यादीत समावेश

केला जाईल. तसेच प्रचलित कायद्यानुसार त्याच्याविरुध्द कारवाई करण्यात येईल आणि त्यांनी दिलेले जामिनदार आणि संदर्भअधिकारी / व्यक्ती यांना सुध्दा ही बाब लेखी स्वरुपात कळविण्यात येईल.

३.४. ही शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आलेल्या विद्यार्थ्याने राज्यात परत येऊन त्याच्या अभ्यासक्रमाचा लाभ राज्यास होईल, याकरीता आवश्यकतेनुसार राज्य शासनास सेवा देणे अपेक्षित आहे. त्याबाबतचे बंधपत्र विद्यार्थ्याने देणे आवश्यक राहिल.

३.५. ही शिष्यवृत्ती मंजूर केलेल्या विद्यार्थ्याने दिनांक ०४ ऑक्टोबर,२०१८ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता करण्याबाबतचे बंधपत्र / हमीपत्र सादर करणे आवश्यक राहिल.

४. शैक्षणिक वर्ष २०२१-२२ करीता शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांना द्यावयाच्या शिष्यवृत्तीच्या रकमेची अचूक परिगणना करण्याची जबाबदारी तंत्र शिक्षण संचालनालयाची असेल. तंत्र शिक्षण संचालनालयाने दि.०४ ऑक्टोबर,२०१८ च्या शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन शिष्यवृत्तीच्या रकमेची परिगणना करावयाची आहे. शासन आदेशात नमूद कोणत्याही अटी/शर्तीची पूर्तता होत नसल्यास ही शिष्यवृत्ती मंजूर करण्यात येऊ नये.

५. सदरचा खर्च हा खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०२१-२२ च्या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्र.डब्ल्यू-३, २२०३ तंत्रशिक्षण-१०७ शिष्यवृत्त्या (००)(०१) गुणवंत मुलामुलींना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मंजूर करणे (२२०३ ३५५१) (कार्यक्रम)"

वरील खर्चासाठी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आहरित करुन अदा करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२११२१०१३२२३९४५०८ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by NITIN JYOTINATH GHIRATKAR
Date: 2021.12.10 17:43:57 +05'30'

**( नि. ज्यो. घिरटकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी

५. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई
८. सर्व प्रशासनिक विभागाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक
११. आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. आयुक्त, दुग्ध व्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३. आयुक्त, मत्स्य व्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. संचालक, माहिती तंत्रज्ञान, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
१८. संचालक, पशु संवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२०. कुलसचिव, सर्व कृषी / अकृषी विद्यापीठे
२१. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, ता.माणगांव, जि.रायगड
२२. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (सर्व), (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
२३. सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालये (सर्व)
२४. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
२५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
२६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
२७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२९. सह / उप सचिव (मशि/विशि/अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३०. अवर सचिव (तांशि-३, विशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३१. कक्ष अधिकारी (मशि-२/मशि-४/तांशि-५/तांशि-६/साशि-१),उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३२. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक
३३. निवडनस्ती/तांशि-४